नविन लेखाशिर्ष उघडणेबाबत

१४ वा वित्त आयोग (सन २०१५-२०२०) "न्याय व्यवस्थेचे सक्षमीकरण" (Strengthening the Justice Sector).

महाराष्ट्र शासन

विधि व न्याय विभाग

शासन निर्णय क्रमांक : चौविआ १२१६/प्र.क्र.१०७/१६/का- नऊ

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,

दिनांक :- १० नोव्हेंबर, २०१६.

पहा : १. मा. प्रधानमंत्री यांचे दि. २३ एप्रिल, २०१५ चे अर्धशासकीय पत्र.

२. केंद्र शासनाचे पत्र क्र. ११०१५/४/२०१५-JUS-II, न्याय विभाग, विधि व न्याय मंत्रालय, नवी दिल्ली दि.२९ मे, २०१५

३. विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. चौविआ- १२१६/प्र.क्र.१०/का.९, दि. ०९ मार्च, २०१६

४. दि.२८ मार्च, २०१६ रोजी घेण्यात आलेल्या उच्चस्तरीय सनियंत्रण समितीच्या बैठकीचे दि.१६ मे, २०१६चे इतिवृत्त.

५. मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्याकडील क्रमांक F&B./14thF.C./76/2016 दिनांक १८ जुलै, २०१६ चे पत्र.

६. विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. चौविआ- १२१६/प्र.क्र.१०/का.९, दि. २३ ऑगस्ट, २०१६

प्रस्तावना :

१४ व्या केंद्रीय वित्त आयोगाने शिफारस केलेल्या "न्याय व्यवस्थेचे सक्षमीकरण" (Strengthening the Justice Sector) या प्रयोजनाकरीता सन २०१५-२०१६ ते २०१९-२०२० या ५ वर्षाच्या कालावधीकरीता महाराष्ट्र राज्यासाठी रुपये १०१४ कोटी इतक्या निधीची शिफारस केली आहे. १४ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार केंद्रीय करातील राज्याला मिळणारा हिस्सा ३२% वरुन ४२% असा वाढवून देण्यात आलेला आहे. या वाढीव हिश्श्यामधून मिळणाऱ्या अतिरिक्त रकमेतून (Tax Devolution) १४ व्या वित्त आयोगाने “न्याय व्यवस्थेचे सक्षमीकरण” (Strengthening the Justice Sector) या प्रयोजनाकरिता केलेल्या शिफारशींची अंमलबजावणी करण्याबाबत केंद्र शासनाने राज्य शासनास सूचित केले आहे. त्यामुळे राज्याच्या अर्थसंकल्पातून याबाबतचा खर्च भागवावा लागणार आहे. यासाठी केंद्राकडून कोणतेही स्वतंत्र अनुदान प्राप्त होणार नाही. १४ व्या वित्त आयोगांतर्गत ज्या घटक/ उद्दिष्टासाठी लेखाशिर्ष उपलब्ध आहे त्या घटक / उद्दिष्टांसाठी अस्तित्वात असलेली लेखाशिर्ष उपयोगात आणवयाची आहेत, तर ज्या घटकासाठी लेखाशिर्ष उपलब्ध नाही त्या घटकासाठी नवीन लेखाशिर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

१४ व्या वित्त आयोगांतर्गत ज्या घटकासाठी लेखाशिर्ष उपलब्ध नाही त्याबाबत मा. उच्च न्यायालयाकडील दि.१८ जुलै, २०१६ रोजीच्या प्राप्त माहितीनुसार आणि वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार खालील प्रमाणे नविन लेखाशिर्ष उघडण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

एक:- अतिरिक्त न्यायालये

| | |
|---|---|
| **मागणी क्र. जे-१,**<br>२०१४, न्यायदान<br>(००) न्यायदान<br>१०५- दिवाणी व सत्र न्यायालये<br>(०७) अतिरिक्त न्यायालये<br>(०७)(०१) अतिरिक्त न्यायालये (२०१४ ०५७५) | Demand No. J-1<br>2014, Administration of Justice<br>(00) Administration of Justice<br>105 Civil and Sessions Courts<br>(07) Additional Courts<br>(07)(01) Additional Courts (2014 0575) |

**दोन:- कार्यरत न्यायालयाचे नविनीकरण**

| | |
|---|---|
| मागणी क्र. जे-१,<br>२०१४, न्यायदान<br>(००) न्यायदान<br>१०२-उच्च न्यायालये<br>(११) कार्यरत न्यायालयाचे नविनीकरण<br>(११)(०१) कार्यरत न्यायालयाचे नविनीकरण (२०१४ ०५४८) | Demand No. J-1<br>2014, Administration of Justice<br>(00) Administration of Justice<br>102 High Courts<br>(11) Re-designing existing Courts<br>(11) (01) Re-designing existing Courts (2014 0548) |

**तीन:- तांत्रिक मनुष्यबळ सहाय्य**

| | |
|---|---|
| मागणी क्र - जे-१,<br>२०१४, न्यायदान<br>(००) न्यायदान<br>१०२-उच्च न्यायालये<br>(१२) तांत्रिक सहाय्य<br>(१२) (०१) तांत्रिक मनुष्यबळ सहाय्य (२०१४ ०५५७) | Demand No. - J-1<br>2014, Administration of Justice<br>(00) Administration of Justice<br>102 High Courts<br>(12) Technical Support<br>(12)(01) Technical Manpower Support (2014 0557) |

**चार:- स्कॅनिंग व डिजीटायझेशन**

| | |
|---|---|
| मागणी क्र. जे-१,<br>२०१४, न्यायदान<br>(००) न्यायदान<br>१०२-उच्च न्यायालये<br>(१२) तांत्रिक सहाय्य<br>(१२)(०२) स्कॅनिंग व डिजीटायझेशन (२०१४ ०५६६) | Demand No. J-1<br>2014, Administration of Justice<br>(00) Administration of Justice<br>102 High Courts<br>(12) Technical Support<br>(12) (02) Scanning & Digitization (2014 0566) |

**पाच:- लॉ स्कूल**

| | |
|---|---|
| मागणी क्र. जे-१,<br>२०१४, न्यायदान<br>(००) न्यायदान<br>११४-विधि सल्लागार व समुपदेशी<br>(००) (०६) लॉ स्कूल (२०१४ ०५८४) | Demand No. J-1<br>2014, Administration of Justice<br>(00) Administration of Justice<br>114-Legal Advisers and Counsels<br>(00)(06) Law School (2014 0584) |

संदर्भीय अनुक्रमांक सहा येथील शासन निर्णयात नमूद केल्यानुसार वरील प्रमाणे लेखाशिर्षाबाबतचे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ख.वि/चा-१/विधि व न्याय विभाग/यूओआर-९६/२०१६-१७/१३८४, दिनांक ०४.११.२०१६ अन्वये प्राप्त झालेल्या

मान्यतेने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ४७६/अर्थ-११/८११६, दि.२२.०८.२०१६ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्र २०१६१११०१६५४२९३२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Neeraj Pradip Dhote

Digitally signed by Neeraj Pradip Dhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=LA Cum Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=714efbf760da6c143fdf63d5ec3da8a8957b82d41451a5f202043ce4895e4205, cn=Neeraj Pradip Dhote
Date: 2016.11.10 16:56:24 +05'30'

(नी.प्र. धोटे)
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे स्वीय सहायक,
२) मा. मुख्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
३) मा. राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
४) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
५) मुख्य सचिवांचे उप सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) प्रबंधक (Central Project Co-ordinator- eCourts Project), उच्च न्यायालय, मुंबई.
१०) प्रबंधक (निरीक्षणे-२), उच्च न्यायालय, मुंबई.
११) प्रबंधक (अर्थसंकल्प व वित्त), उच्च न्यायालय, मुंबई.
१२) संचालक, अभियोग संचालनालय, मुंबई.
१३) सदस्य सचिव, महाराष्ट्र विधि सेवा प्राधिकरण, मुंबई.
१४) सहसंचालक, महाराष्ट्र ज्युडीशिअल अकादमी, उत्तन, ठाणे.
१५) सहसंचालक, न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, नागपूर.
१६) उप सचिव, महाराष्ट्र विधि सेवा प्राधिकरण, मुंबई.
१७) उप सचिव (सेवा), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) वित्त विभाग (कार्या. व्यय-५, अर्थसंकल्प-११, वित्त आयोग कक्ष)
१९) विधि व न्याय विभागातील सर्व कार्यासने व शाखा.
२०) निवडनस्ती.